अहिल्यानगर जिल्ह्यात १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमईडी-२०२५/प्र.क्र.२१८ (ई-११०३२०४)/२५/ शिक्षण-१**
९ वा मजला, गो.ते.रुग्णालय संकुल, नवीन मंत्रालय,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
दिनांक: २३ मे, २०२५

**प्रस्तावना :**

राज्याच्या निमशहरी, ग्रामीण, दुर्गम व अतिदुर्गम भागातील जनतेस आरोग्यविषयक सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी डॉक्टरांच्या संख्येत वाढ करणे गरजेचे आहे. यास्तव राज्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय नसणाऱ्या जिल्ह्यांमध्ये प्रत्येकी १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेची नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय स्थापन करण्याचा निर्णय राज्य शासनाने घेतला आहे. त्यानुषंगाने राज्यातील पालघर, गडचिरोली, अमरावती, वाशिम, जालना, बुलढाणा, ठाणे (अंबरनाथ), भंडारा, वर्धा व हिंगोली या १० जिल्ह्यांमध्ये प्रत्येकी १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय स्थापन करण्यास दि. २८.०६.२०२३ व दि.१६.०९.२०२३ रोजींच्या मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत मान्यता प्रदान करण्यात आली आहे. यासंदर्भातील शासन निर्णय दि.१४.०७.२०२३ व दि.०१.११.२०२३ रोजी निर्गमित करण्यात आले आहेत. तथापि अहिल्यानगर जिल्ह्यात सुयोग्य जागेअभावी शासकीय वैद्यकीय महाविद्यालयास मान्यता देण्यात आली नव्हती.

२. राज्य शासनाने शासकीय वैद्यकीय महाविद्यालये स्थापन करण्याबाबत घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने राज्यातील इतर सर्व जिल्ह्यांमध्ये शासकीय वैद्यकीय महाविद्यालयांची स्थापना करण्यात आली आहे. यास्तव पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांच्या ३०० व्या जयंतीच्या पार्श्वभूमीवर अहिल्यानगर जिल्ह्यातील जनतेस अधिकाधिक वैद्यकीय सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी सदर जिल्ह्यात १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास दिनांक ०६.०५.२०२५ रोजीच्या मा. मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यता प्राप्त झाली असून शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

१) अहिल्यानगर जिल्ह्यात १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर

महाविद्यालयाचे नाव पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय असे राहील.

२) राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोगाच्या मानकांनुसार अहिल्यानगर जिल्ह्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालयाकरिता सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारीतील जिल्हा सामान्य रुग्णालय, आवश्यक स्थावर जंगम मालमत्ता व मनुष्यबळासह, तात्पुरत्या स्वरूपात किमान ७ वर्षांसाठी वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागास नि:शुल्क वापरास उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३) राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोगाच्या मानकांनुसार सदर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रुग्णालयाकरिता आवश्यक व सुयोग्य जागेबाबत मा.मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेने गठित मंत्री समितीमार्फत अंतिम निर्णय घेण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर जागा महसूल विभागाच्या सहमतीने संबंधित जिल्हाधिकारी यांच्यामार्फत वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागास नि:शुल्क हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर जागेत नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रुग्णालय स्थलांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४) सदर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयासाठी अनुक्रमे विवरणपत्र- ३ व ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे आवश्यक पदनिर्मिती करण्यास, त्यावरील खर्चास आणि पदे भरण्यास मान्यता देण्यात येत आहे. यासाठी उच्चस्तरीय समितीच्या मान्यतेची अट शिथील करण्यात येत आहे.

५) सदर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रुग्णालयासाठी विवरणपत्र- १ व २ मध्ये दर्शविल्याप्रमाणे आवश्यक तसेच अतिरिक्त बांधकाम करण्यास व त्यासाठी आवश्यक खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

६) सदर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयासाठी विवरणपत्र-५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे अंदाजे रू.४८५.०८ कोटी (अनावर्ती खर्च सुमारे रु. ३६१.७५ कोटी व पहिल्या चार वर्षांकरिता आवर्ती खर्च सुमारे रूपये १२३.३३ कोटी) इतका निधी उपलब्ध करुन सदर निधीच्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे. त्याचप्रमाणे आवश्यकतेनुसार निधी वेळोवेळी पूरक मागणीद्वारे उपलब्ध करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच, चौथ्या वर्षाप्रमाणे आवश्यक आवर्ती खर्चासाठी प्रति वर्षी सुमारे रूपये ४३.६१ कोटी इतका निधी उपलब्ध करून त्याप्रमाणे खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

७) सदर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रुग्णालयाकरिता आवश्यक असणारी स्वच्छता, आहार, सुरक्षा, वस्त्र स्वच्छता ही सर्व कामे बाह्यस्त्रोतामार्फत करून घेण्यास परवानगी देण्यात येत

आहे. सदरची कामे शासनाच्या पूर्व मान्यतेने जाहीर निविदा प्रक्रियेच्या माध्यमातून ठेकेदारांच्या नियुक्तीद्वारे करुन घेण्यात यावीत.

८) प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्रमांक १८६/नियोजन १४७५, दि.०२.०५.२०२५ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३८१/व्यय-१३/२०२५, दि.२.०५.२०२५ रोजीच्या अभिप्रायानुसार आणि मा. मंत्रीमंडळाच्या दि.०६.०५.२०२५ रोजीच्या बैठकीतील मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२३१२००५४५२१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PAWAR TUSHAR PITAMBAR

Digitally signed by PAWAR TUSHAR PITAMBAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0e7c2b89250ac281fa15181edd75966aecf408d6530259d654b6605cd5fc363d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8B620EC181468E9AE13715CE8039879786D8786251F299A0EBE5B1878CD6E05C, cn=PAWAR TUSHAR PITAMBAR
Date: 2025.05.23 12:01:57 +05'30'

**(डॉ. तुषार पवार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मंत्री,वैद्यकीय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. राज्यमंत्री,वैद्यकीय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधानभवन, मुंबई.
९. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधानभवन, मुंबई.
१०. सचिव, आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार, निर्माण भवन, नवी दिल्ली.
११. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१३. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई
१५. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
१६. संचालक, आयुष संचालनालय, मुंबई
१७. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
१८. कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक

१९. जिल्हाधिकारी, अहिल्यानगर
२०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ / २ महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
२१. जिल्हा कोषागार अधिकारी, अहिल्यानगर
२२. जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, अहिल्यानगर
२३. सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालये.
२४. सर्व सह सचिव/उप सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. कार्यासन शिक्षण -२, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
२६. निवडनस्ती (शिक्षण-१).

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग शासन निर्णय क्र. एमईडी-२०२५/प्र.क्र.२१८ (ई-११०३२०४)/२५/शि-१, दिनांक - २३ मे, २०२५ चे सहपत्र**

**सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिनस्त संस्थांमध्ये डागडुजीसाठीचा तपशील (विवरणपत्र-१)**

| क्र. | खर्चाचे विवरण | आवश्यक अंदाजित निधी (रुपये कोटी) |
|---|---|---|
| १ | सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखाली जिल्हा रुग्णालयांच्या इमारतींमधील किरकोळ बदल व आवश्यक डागडुजी | ५.०० |
| २ | सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखाली जिल्हा रुग्णालयांच्या इमारतींमधील किरकोळ आंतरीक बदल व विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक कार्यक्रमासंबंधी (प्रथम व व्दितीय वर्ष एमबीबीएस) यंत्रसामुग्री खरेदी, फर्निचर व ग्रंथालयासाठी आवश्यक पुस्तके इ. | २०.०० |
| | **एकूण** | **२५.००** |

**महाविद्यालय व रुग्णालय यांचे बांधकामाकरिता खर्चाचे अंदाजपत्रक (विवरणपत्र-२)**

| क्र. | इमारतीचे स्वरुप | आवश्यक बांधकाम (चौ.मी.) | खर्च प्रति चौ.मि. | अंदाजित खर्च (रुपये कोटी) |
|---|---|---|---|---|
| १ | प्रशासकीय इमारत (महाविद्यालय) Administrative block - college | ६४५० | २८,०००/- (बांधकाम खर्च+ ६०% अनुषंगीक खर्च मिळून एकूण बांधकाम खर्च = ४४८००/-) | २८.९० |
| २. | अचिकित्सालयीन व चिकित्सालयीन विभाग | ३०३६ | ४४८००/- | १३.६० |
| ३. | रुग्णालयीन इमारत | २१३२३ | ४४८००/- | ९५.५२ |
| ४. | अधिकारी/कर्मचारी आवास आणि विद्यार्थी वसतिगृह | १७५७५ | ४४८००/- | ७८.७३ |
| | **एकूण** | **४८३८४** | | **२१६.७५** |

## वैद्यकीय महाविद्यालयाकरिता आवश्यक पदे व त्यावरील चार वर्षांचा अंदाजित खर्च

(विवरणपत्र-३)

| क्र. | संवर्ग | | महाविद्यालयाकरिता आवश्यक पदे व अंदाजित खर्च (रुपये कोटी) |
|---|---|---|---|
| १ | वर्ग-१ | पदे | ४८ |
| | | खर्च | १४.१४ |
| २ | वर्ग-२ | पदे | ४४ |
| | | खर्च | ५.७३ |
| ३ | विद्यावेतनाची पदे | पदे | ५९ |
| | | खर्च | ४.६७ |
| ४ | वर्ग-३ (नियमित पदे) | पदे | ९३ |
| | | खर्च | ५.३२ |
| ५ | काल्पनिक पदे वर्ग-३ (बाह्यस्रोताने) | पदे | १३९ |
| | | खर्च | ३.६७ |
| ६ | वर्ग-४ (कंत्राटी) | पदे | ६५ |
| | | खर्च | १.१७ |
| | **एकूण** | **पदे** | **४४८** |
| | | **खर्च** | **३४.७०** |

## रुग्णालयाकरिता आवश्यक पदे व त्यावरील चार वर्षांचा अंदाजित खर्च

(विवरणपत्र-४)

| क्र. | संवर्ग | | रुग्णालयाकरीता आवश्यक पदे व अंदाजित खर्च (रुपये कोटी) |
|---|---|---|---|
| १ | वर्ग-१ | पदे | ३ |
| | | खर्च | ०.३६ |
| २ | वर्ग-२ | पदे | १४ |
| | | खर्च | १.०९ |
| ३ | वर्ग-३ (नियमित पदे) | पदे | ५०३ |
| | | खर्च | ३२.२२ |
| ४ | वर्ग-३ (काल्पनिक पदे) | पदे | ३७ |
| | | खर्च | ०.९० |
| ५ | वर्ग-४ (कंत्राटी) | पदे | ४२९ |
| | | खर्च | ७.७२ |
| | **एकूण** | **पदे** | **९८६** |
| | | **खर्च** | **४२.२९** |

**शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयाच्या स्थापनेकरिता चार वर्षांचा अंदाजित खर्च**
**(विवरणपत्र-५)**

| क्र. | खर्चाचा तपशिल | प्रथम वर्ष | व्दितीय वर्ष | तृतीय वर्ष | चतुर्थ वर्ष | एका संस्थेकरिता अंदाजित खर्च (रुपये कोटी) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | किरकोळ दुरुस्ती वरील खर्च | २५.०० | ००.०० | ००.०० | ००.०० | २५.०० |
| २ | इमारत व बांधकाम | ६०.०० | ६०.०० | ४९.०० | ४७.७५ | २१६.७५ |
| ३ | यंत्र सामुग्री उपकरणे | २६.०० | २८.०० | ३५.०० | ३१.०० | १२०.०० |
| | **एकूण अनावर्ती खर्च** | **१११.००** | **८८.००** | **८४.००** | **७८.७५** | **३६१.७५** |
| ४ | महाविद्यालयीन अधिकारी व कर्मचारी | ३.९२ | ५.४६ | १०.९० | १४.४२ | ३४.७० |
| ५ | रुग्णालयीन अधिकारी व कर्मचारी | ५.०९ | ७.२३ | १३.७३ | १६.२४ | ४२.२९ |
| ६ | आवर्ती खर्च (दैनंदिन) | ५.८७ | ७.५१ | ८.६२ | ९.०३ | ३१.०३ |
| ७ | बाहय स्त्रोत खर्च | ३.७३ | ३.८० | ३.८६ | ३.९२ | १५.३१ |
| | **एकूण आवर्ती खर्च (चार वर्षासाठी)** | **१८.६१** | **२४.००** | **३७.११** | **४३.६१** | **१२३.३३** |
| | **एकूण खर्च (आवर्ती+अनावर्ती)** | **१२९.६१** | **११२.००** | **१२१.११** | **१२२.३६** | **४८५.०८** |